**हज हाऊस, औरंगाबाद या इमारतीच्या बांधकामाकरिता सिडको लि., औरंगाबाद यांना वर्ष २०१६-१७ करिता रु. ८.०० कोटी निधी वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- हज-२०१६ /प्र.क्र.२९०/ का-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०७.१२.२०१६

**वाचा-**

१.शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र हज-२००९/प्र.क्र.५८/कार्या.-५, दि. २२.०१.२०१०
२.शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र हज-२००९/प्र.क्र.५८/कार्या.-५, दि.१६.०३.२०१०,
३.शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र हज-२००९/प्र.क्र.५८/कार्या.-५, दि. ३१.०३.२०१०,
४.शासन ज्ञापन महसुल व वन विभाग क्र जमीन ३९१२/प्र.क्र.५३/ज-७, दि. २२.०८.२०१३,
५.शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र हज-२००९/प्र.क्र.५८/कार्या.-५, दि. १५.०१.२०१४,
६.शासन पत्र क्र. , हज-२००९/प्र.क्र.५८/कार्या.-५, दि. २९.०६.२०१३,
७.अधीक्षक अभियंता, सिटी ॲण्ड इंडस्ट्रियल डेव्हलपमेंट कार्पोरेशन ऑफ महाराष्ट्र लि, औरंगाबाद यांचे पत्रक्र. सिडको/अ.अ.(न.शा.)/२०१६/२७१ ,दि. ०४.११.२०१६,
८.कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे क्र. २०१४/प्र.क्र.०३/इमारती-१, दि. १०.०२.२०१४,
९.शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र हज-२००९/प्र.क्र.५८/कार्या.-५, दि. १५.०५.२०१४,
१०. शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र. हज-२०१५/प्र.क्र.१५७/का-५, दि.२२.०६.२०१५,
११.शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र हज-२०१५/प्र.क्र.१५७/का.-५, दि. ०३.११.२०१५,
१२. शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र. हज-२०१५/प्र.क्र.१५७/का-५, दि.०३.०२.२०१६,
१३. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र. ८९/अर्थसंकल्प-३, दि. २०.०४.२०१६.

**प्रस्तावना :-**

औरंगाबाद येथील सर्व्हे क्र. ६६५६ मधील शाही मस्जिद जवळ हज हाऊसचे बांधकाम सिडको लि. मार्फत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. यासाठी शासनाकडून सिडको लि. शी सामंजस्य करार (MOU) करण्यात आला आहे. हज हाऊस, औरंगाबाद च्या बांधकामाच्या प्रकल्पाचा एकूण खर्च रु. २९.८८कोटी इतका आहे. औरंगाबाद येथील हज हाऊस बांधकामासाठी रु. २९.८८ कोटी इतक्या सुधारित प्रकल्प खर्चास उपरोक्त अ.क्र. ( ९ ) येथील आदेशान्वये द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सन २००९-१० या वर्षामध्ये सिडको लि. यांना रु ४.०० कोटी इतका निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सन २०१५-१६ या आर्थिक वर्षामध्ये हज हाऊसच्या बांधकामाकरिता उपरोक्त अ.क्र. १०, ११ व १२ येथील शासन निर्णयान्वये एकूण रु. ६.०० कोटी इतका निधी सिडको लि. यांना वितरित करण्यात आला आहे. सन २०१६-१७ करिता या

कामी सिडको लि. यांना रु.८.०० कोटी इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१६-१७ या वित्तीय वर्षात मागणी क्र. झेड ई-१ ए, मुख्य लेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाज कल्याण २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना ( ०१ ) ( १९ ) हज कमिटीला सहाय्यक अनुदान ( २२३५ ए- २७६ ) या लेखाशीर्षाखाली मूळ अर्थसंकल्पातील रु. १० कोटी इतकी तरतूद करण्यात आलेली आहे. वित्त विभागाच्या उपरोक्त अ.क्र. १३ येथील दि.२०.०४.२०१६ च्या परिपत्रकानुसार हज हाऊस औरंगाबाद येथील बांधकामासाठी एकूण रु.१०.०० कोटी तरतुदीच्या ८० टक्के म्हणजे रु. ८.०० कोटी (रुपये आठ कोटी फक्त) इतका निधी वितरित करण्यास या आदेशान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र राज्य हज समितीमार्फत सदर निधी उपाध्यक्ष आणि व्यवस्थापकीय संचालक, सिटी अॅण्ड इंडस्ट्रियल डेव्हलपमेंट कार्पोरेशन ऑफ महाराष्ट्र लि., मुंबई यांना वितरीत करण्यासाठी याद्वारे महाराष्ट्र राज्य हज समितीकडे सुपूर्द करण्यात येत आहे.

३. कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई यांनी रु. ८.०० कोटी ( रुपये आठ कोटी फक्त ) इतक्या रकमेचा धनादेश " उपाध्यक्ष आणि व्यवस्थापकीय संचालक, सिटी अॅण्ड इंडस्ट्रियल डेव्हलपमेंट कार्पोरेशन ऑफ महाराष्ट्र लि., मुंबई ” यांच्या नावे काढून तो त्यांना रितसर सुपूर्द करावा. तसेच त्यांनी उपाध्यक्ष आणि व्यवस्थापकिय संचालक, सिटी अॅण्ड इंडस्ट्रियल डेव्हलपमेंट कार्पोरेशन ऑफ महाराष्ट्र लि., मुंबई यांच्याकडून झालेल्या खर्चाबाबतचा तपशील प्राप्त करुन घेवून त्या आधारे विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

४. प्रस्तुत प्रयोजनासाठी होणारा खर्च मागणी क्र. झेड ई-१ ए, मुख्य लेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण २०० व इतर कार्यक्रम, राज्य योजनेंतर्गत योजना (०१) (१९) हज कमिटीला सहाय्यक अनुदान (२२३५ ए-२७६) या लेखा शीर्षाखाली सन २०१६-१७ या वित्तीय वर्षात मंजूर सहायक अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०७१४०३३७५६१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anees Iqbal Ismail Shaikh
Digitally signed by Anees Iqbal Ismail Shaikh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=447981acddcc5079f9c00eadfad2054d955a80a21de6164c4024daf5a9ea2c97, cn=Anees Iqbal Ismail Shaikh
Date: 2016.12.08 12:48:22 +05'30'

**( अनिस शेख )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
३. महालेखापाल -१/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर,
४. अधिक्षक अभियंता ( एम. टी.) सिडको, उद्योगभवन, औरंगाबाद,

५. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद,
६. कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई
७. खाजगी सचिव, मा. मंत्री /मा. राज्यमंत्री ( अ.वि.वि.) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई,
८. स्वीय सहायक, प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. स्वीय सहायक, सह सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग,मुंबई,
१०. स्वीय सहायक, उप सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग,मुंबई,
११. कक्ष अधिकारी (का-७), अल्पसंख्याक विकास विभाग, मुंबई,
१२. वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. निवड नस्ती ( कार्यासन-५).